**मौजे-हातुर्णा,पळसवाडा व भापकी, तालुका वरुड, जिल्हा अमरावती या पूरग्रस्त गावातील नळ पाणी पुरवठा या नागरी सुविधेच्या कामाला सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - एफएलडी-२०१९/३७४/प्र.क.९३/र-१२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक- १३ एप्रिल २०२२

वाचा:-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एफएलडी ४६९५/प्र.क.६०१/र-१२,दि.२१-०४-१९९५
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. जीटीएन१०८३/२१७/र-१२, दि.१०-०२-१९८३
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.०१-०८-२००९
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८-०३-२०११
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र एफएलडी-२०१९/३७४/प्र.क.९३/र-१२, दि.०१-१२-२०२१
६) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र. उपआ/पुनर्व/भुसं-१/म.स./कावि-५२/२०२२,दि.०८-०२-२०२२.

प्रस्तावना:-

संदर्भ क्रमांक ५ अन्वये मौजे-हातुर्णा, पळसवाडा व भापकी जि. अमरावती या पुनर्वसित गावांमध्ये नळ पाणी पुरवठा व विद्युत पुरवठा या नागरी सुविधाच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मंजुरी देण्यात आली आहे. तथापि विद्युत पुरवठा या नागरी सुविधाच्या प्रशासकीय मान्यता वगळता संदर्भ क्रमांक ६ अन्वये विभागीय आयुक्त, अमरावती यांनी दरसुचीतील बदलामुळे सादर केलेल्या मौजे-हातुर्णा, पळसवाडा व भापकी जि. अमरावती या पुनर्वसित गावांमध्ये नळ पाणी पुरवठा योजना या नागरी सुविधा कामांच्या प्रस्तावास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

खाली नमूद केलेल्या पूर पुनर्वसित गावांतील ग्रामीण नळ पाणी पुरवठा या नागरी सुविधेच्या **एकुण रु.२,०७,५१,३३०/- (अक्षरी दोन कोटी सात लक्ष एकावण्ण हजार तीनशे तीस फक्त)** इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून खालीलप्रमाणे सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | शासन निर्णय दि.०१/१२/२०२१ च्या प्रशा. मान्यतेची रक्कम | सुधारीत अंदाजपत्रकीय रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | हातुर्णा | ग्रामीण नळ पाणी पुरवठा. | ५०,५३,०००/- | ६१,२०,९३०/- |
| २ | भापकी | ग्रामीण नळ पाणी पुरवठा. | ७५,७८,२००/- | ६४,९८,७००/- |
| ३ | पळसवाडा | ग्रामीण नळ पाणी पुरवठा. | ६३,४२,८००/- | ८१,३१,७००/- |
| | | **एकूण** | **१,८९,७४,०००/-** | **२,०७,५१,३३०/-** |

**अटी व शर्ती :-**

१) नागरी सुविधा कामे करताना प्रस्तुत प्रस्तावित समाविष्ट असलेले गौण खनिज स्वामीत्वधनाची वसूली करण्याची जबाबदारी संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेची राहील.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. जीटीएन १०८३ /२१७/र-१२, दि.१०-०२-१९८३, शासन निर्णय क्र. आरसीपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१-०८-२००९ व शासन परिपत्रक क्र. आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८-०३-२०११ अन्वये पुनर्वसित / विस्तारित गावठाणातील नागरी सुविधा पुरविण्यासाठी निर्धारित करण्यात आलेल्या भौतिक मानकांनुसार काम करुन घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील.

३) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांवर होणारा खर्च मंजूर अंदाजपत्रकांतील रकमेपेक्षा अधिक होणार नाही, याची संबंधित अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी योग्य ती दक्षता घ्यावी.

४) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांसाठीच्या अंदाजपत्रकांत दर्शविलेली कामनिहाय रक्कम तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेतील अटींचे विहित कार्यपध्दतीनुसार पालन होईल, याची संबंधित कार्यान्वयल यंत्रणेच्या संबंधित अधिक्षक अभियंता व संबधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

५) संबंधित कार्यकारी अभियंता यांनी प्रस्तावाधीन नागरी सुविधा सर्व दृष्टीने पूर्ण झाल्यावर व त्याप्रमाणे जिल्हाधिकारी, अमरावती यांचेकडून प्रमाणपत्र घेतल्यानंतर संबंधित जिल्हा परिषदेकडे हस्तांतरित कराव्यात व तत्संबंधात जिल्हाधिकारी, अमरावती यांचेमार्फत शासनाच्या पुनर्वसन विभागास अवगत करावे.

६) महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम विभाग कार्यनियमावलीतील प्रचलित नियमांनुसार सदर नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांस संबंधित कार्यान्वयन यंत्रणेच्या अधिक्षक अभियंता / कार्यकारी अभियंता यांनी तांत्रिक मान्यता प्रदान केलेली असावी.

७) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामे यापूर्वी अन्य कोणत्याही योजनेतून करण्यात आलेली नाहीत. अथवा सदरची कामे अन्य योजनेत समाविष्ट नाहीत, असे या कामांवर यापूर्वी खर्च करण्यात आलेला नाही, याबाबत प्रकल्प यंत्रणेने खात्री केलेली असावी.

८) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांचा उचित दर्जा राखला जाईल, याची संबंधित अधिक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी योग्य ती दक्षता घ्यावी.

९) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम, जिल्हा परिषद, अमरावती यांनी प्रस्तुत प्रशासकीय मान्यता आदेशांतील अटींची पूर्तता प्रचलित प्रक्रिया पूर्ण करुन प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामे तात्काळ सुरु करावीत.

**२.** उपरोक्त नागरी सुविधा कामावरील खर्च " मागणी क्रमांक सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-०२ पूर, चक्रीवादळे इत्यादि, १०१, अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०४) पुरामुळे बाधित झालेल्या व्यक्तिंच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणी पुरवठा, शाळा चावडी, विदयुत पुरवठा, नागरी सुविधावरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ २२२९) ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) " या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीमधून करण्यात येईल.

३. संबंधित कार्यान्वयन यंत्रणेच्या कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम, जिल्हा परिषद, अमरावती यांनी प्रस्तुत नागरी सुविधा कामांच्या प्रगतीचा अहवाल / खर्चाच्या प्रगतीचा अहवाल यासह निविदा प्राप्त कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानूसार जिल्हाधिकारी कार्यालयामार्फत निधीची मागणी करण्यात यावी. तसेच कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, बांधकाम विभाग, अमरावती यांनी उपरोक्त लेखाशिर्षाखाली निधी उपलब्ध आहे, याची खात्री करुन **प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर निविदा प्राप्त कामांसाठीचे कार्यारंभ आदेश देऊन नागरी सुविधा कामे तात्काळ सुरु करावीत.** सदरची नागरी सुविधांची कामे निधी उपलब्ध करुन देण्यात आलेल्या आर्थिक वर्षात पूर्ण करण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील. सदरच्या सुविधा कामांसाठी वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने प्रलंबित उपयोजन प्रमाणपत्रे (Utilisation Certificates ) प्राथम्याने सादर करावीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४१३१२३७५८५८१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHULARAM R NIKHARE

Digitally signed by CHULARAM R NIKHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=888a9197d5a4831c7e5ef0c4328259521ba94feaafdffbadf353be3592552a31, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E37123E923CF43F99F06B54384FF491E5F703F14D653B5A59D47EAB1F73E2597, cn=CHULARAM R NIKHARE
Date: 2022.04.13 12:38:58 +05'30'

**( चु. रा. निखारे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१) विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) अमरावती विभाग,अमरावती

२) उप आयुक्त (पुनर्वसन ), अमरावती विभाग, अमरावती
३) जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, अमरावती
४) मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद, अमरावती
५) कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद बांधकाम विभाग, अमरावती
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य ,मुंबई -१ / नागपूर-२ (२ प्रतीत)
७) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य ,मुंबई -१ / नागपूर-२ (२ प्रतीत)
८) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
९) वित्त विभाग,कार्यासन व्यय ९/ व्यय १०/ अर्थसंकल्प ६, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१०) कार्यासन अधिकारी, कार्यासन ब-१/ कार्यासन -पी.ए.सी. , महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
११) निवड नस्ती, कार्यासन र-१२, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मंबई ४०० ०३२